**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी (एस-२३) या संवर्गातील अधिकाऱ्यांना पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक :** मविसे-१०२४/प्र.क्र.१८५/२०२४/आस्था-३ (२)
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: २४ मार्च, २०२५

**वाचा:** ग्राम विकास विभाग, शासन आदेश क्र. मविसे-१०२४/प्र.क्र.१८५/२०२४/आस्था-३, दि. २६.११.२०२४

**शासन आदेश :-**

उपरोक्त वाचा येथील दिनांक २६.११.२०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये श्री. एस.बी. भंडारे व श्री. ए.डी. आंदेलवाड यांना गटविकास अधिकारी (एस-२०) या संवर्गातून उप मुख्य कार्यकारी अधिकारी (एस-२३) या संवर्गात तात्पुरती पदोन्नती देण्यात आली आहे. तथापि त्यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील असे सदर आदेशात नमूद केले होते.

२. सामान्य प्रशासन विभाग एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दिनांक १४.०७.२०२१ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०२१" मधील तरतूदींच्या अधीन नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने सदर अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | तात्पुरती पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एस.बी. भंडारे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, आटपाडी, जि.सांगली | गट विकास अधिकारी, पंचाय समिती, करवीर, जि. कोल्हापूर | रिक्त पदी |
| २. | श्री.ए.डी. आंदेलवाड, गट विकास अधिकारी, पंचायत समिती अहमदपूर, जि.लातूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पुसद, जि. यवतमाळ | रिक्त पदी |

३. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून संबंधित अधिकारी यांनी पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.०८.१९८२ च्या

शासन परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी पदस्थापनेत बदल/नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास, सदर शासन परिपत्रकातील सूचनांनुसार ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. श्री.एस.बी. भंडारे व श्री. ए.डी. आंदेलवाड यांच्या पदोन्नतीबाबतचा वाचा येथील दि. २६.११.२०२४ रोजीच्या शासन आदेशातील अटी व शर्ती लागू राहतील.

५. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी पदस्थापना झालेल्या अधिकारी यांना त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

६. संबंधित अधिकारी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा, संबंधित अधिकारी विहित कालावधीत पदस्थापना झालेल्या पदावर रूजू न झाल्यास, उक्त अधिकाऱ्याविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२४१६२४३५१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.03.24 16:25:23 +05'30'

**( डॉ.उर्मिला जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (ग्राम विकास ) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभ बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई,
५) विभागीय आयुक्त, पुणे/छत्रपती संभाजीनगर/अमरावती.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर / यवतमाळ / सांगली / लातूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर / यवतमाळ / सांगली / लातूर
८) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
९) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.)
१०) अवर सचिव (कार्यासन आस्था-२), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
११) निवड नस्ती (कार्यासन आस्था-३), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.